महाराष्ट्र शासन

गृह विभाग

शासन ज्ञापन क्र. सीआरपी-१११३/प्र.क्र.**३६६**/पोल-७.

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक २१ जानेवारी, २०२०.

विषय :- पोलीस अधीक्षक, सोलापूर (ग्रामीण), यांच्या आस्थापनेवरील उपविभागीय पोलीस अधिकारी, बार्शी, यांच्या कार्यालयाकरिता नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम करण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

संदर्भ :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.

३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दिनांक २०.०९.२०१९.

४) शासन परिपत्रक, सा.बां. विभाग, क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा.-२, दिनांक २५.०९.२०१९.

५) पोलीस महासंचालक, म.रा., यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २७-ब/ २८-ब-२/ सोलापूर-ग्रा./ एस.डी.पी.ओ.-बार्शी-इमा./ १२४/ २००३, दिनांक ०३.०१.२०२०.

६) पोलीस महासंचालक, म.रा., यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २७-ब/ २८-ब-२/ सोलापूर-ग्रा./ एस.डी.पी.ओ.-बार्शी-इमा./ १२४/ २००३, दिनांक २१.०१.२०२०.

ज्ञापन.-

पोलीस महासंचालक, म.रा., यांनी पोलीस अधीक्षक, सोलापूर (ग्रामीण), यांच्या आस्थापनेवरील उपविभागीय पोलीस अधिकारी, बार्शी, यांच्या कार्यालयाकरिता नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम करण्यासाठी रु.१,७०,२३,०००/- इतक्या खर्चाच्या अंदाजास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त खर्चाचे अंदाज हे सहायक अभियंता, श्रेणी-१, सा.बां. उप विभाग, बार्शी, यांनी सन २०१९-२० च्या राज्य दरसूचीनुसार तयार केले असून ते (१) कार्यकारी अभियंता, सा.बां. विभाग क्र.२, सोलापूर, (२) अधीक्षक अभियंता, सा.बां. मंडल, सोलापूर, (३) मुख्य अभियंता, सा.बां. प्रदेश, पुणे, आणि (४) पोलीस अधीक्षक, सोलापूर (ग्रामीण), यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाच्या अंदाजास अधीक्षक अभियंता, सा.बां. मंडल, सोलापूर, यांनी तांत्रिक सहमती दिली असून मुख्य अभियंता, सा.बां. प्रदेश, पुणे, यांनी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याकरिता शिफारस केली आहे.

४. त्या अनुसार, सोलापूर (ग्रामीण), यांच्या आस्थापनेवरील उपविभागीय पोलीस अधिकारी, बार्शी, यांच्या कार्यालयाकरिता नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम करण्यासाठी रु.१,७०,२३,०००/- *(रुपये एक कोटी, सत्तर लक्ष, तेवीस हजार फक्त)* इतक्या खर्चाच्या अंदाजास, निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरु करु नये या अटीवर, याद्वारे, प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

५. उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग-मागणी क्र. बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, ८००, इतर खर्च, (००) (००)(११) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण पोलीस विभागाच्या कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणे (४०७००२११) (कार्यक्रम) ५३, मोठी बांधकामे, या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे शासन ज्ञापन, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच, अ.क्र.१ येथील वित्तीय शक्तीच्या बाबतीत प्रशासनिक विभाग या नात्याने गृह विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करुन सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००१२११७३७१४२०२९ असा आहे. हे शासन ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad01184493f2735ad885627, postalCode=400032, street=2ND FLOOR,MANTRALAYA,MADAME CAMA MARG,MUMBAI, serialNumber=8538cd1e408948f7d025537d5f6589bd8958d1b95322e66d2cc5edf89ad0d79e, ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2020.01.21 17:38:36 +05'30'

(स्वप्नील गोपाल बोरसे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) विशेष पोलीस महानिरीक्षक, कोल्हापूर परिक्षेत्र, कोल्हापूर.
३) पोलीस अधीक्षक, सोलापूर (ग्रामीण).

प्रत-

१) मुख्य अभियंता, सा.बां. प्रदेश, पुणे.
२) अधीक्षक अभियंता, सा.बां. मंडल, सोलापूर.
३) कार्यकारी अभियंता, सा.बां. विभाग क्र.२, सोलापूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर.

५) प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.

६) महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.

७) कार्यासन अधिकारी (इमा.-२), सा.बां. विभाग, मंत्रालय, मुंबई.

८) कार्यासन अधिकारी (व्यय-७/विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) निवड फाईल (पोल-७).